**कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान योजनेसाठी सन २०२४-२५ या वर्षात अर्थसंकल्पिय तरतुदीपैकी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी खर्च करण्यासाठी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन, क्रमांक: जमीन-२०२४/प्र. क्र. ७६५ /अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १० मार्च, २०२५.

<u>वाचा</u> : शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक २५ जुलै, २०२४.

**<u>ज्ञापन</u> :**

आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान योजनेसाठी सन २०२४-२५ या वर्षात अर्थसंकल्पिय तरतुदीपैकी उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रकाच्या अनुषंगाने वित्त विभागाने अर्थसंकल्पिय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स/BEAMS) उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च करण्यासाठी या ज्ञापनाद्वारे वितरीत करण्यात येत आहे, याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

**(रुपये हजारात)**

| **अ. क्र.** | **कर्मवीर दादासाहेब गायकवाड सबळीकरण व स्वाभिमान योजना** | **अर्थसंकल्पिय तरतूद ₹** | **खर्च करण्यासाठी वितरीत करण्यात येत असलेला निधी ₹** |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १. | २२२५,<br>३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)<br>२२२५ ३६१८ | २०,००,०००<br>(अक्षरी रुपये दोनशे कोटी फक्त) | २,५०,०००<br>(अक्षरी रुपये पंचवीस कोटी फक्त) |

२. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून सदर निधी प्रस्तुत योजनेसाठी खर्च करण्याची आणि असा खर्च करताना विहित कार्यपद्धतीचा अवलंब केलेला आहे याची खातरजमा करण्याची जबाबदारी सर्वसंबंधितांची राहिल.

३. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४मधील निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्यात यावे.

४. उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक २५ जुलै, २०२४मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत योजनेवर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२४-२५ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा:

मागणी क्रमांक एन-३
मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण
०१, अनुसूचित जातींचे कल्याण
(०३) (०५) अनुसूचित जाती आणि नवबौध्द भूमिहिन शेतमजूरांना जमिनीचे वाटप. (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)
३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)
२२२५ ३६१ ८

६. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक २५ जुलै, २०२४मधील प्रत्येक बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. तसेच, वित्तीय अधिकारांतर्गत महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिकेत विहित केलेल्या अटींनुसार सदर निधी खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी नियंत्रण अधिकारी यांची राहिल. सदर निधी वितरीत करताना आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

७. सदर शासन ज्ञापन उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रकान्वये विभागास प्राप्त अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३१०१७४११५१६२२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2025.03.10 17:43:08 +05'30'

**(प्रविण शिशुपाल)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, सर्व.

प्रत,

१. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, सर्व.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती /अजाक.